माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील सहायक संचालक (माहिती)/माहिती अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने, गट-ब संवर्गात सरळसेवेने नियुक्ती करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.माजम-२०१०/११२८/प्र.क्र.५/१०/३४-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २० एप्रिल, २०११.

**शासन निर्णय :**

माहिती व जनसंपर्क महासंचालनायातील सहायक संचालक (माहिती)/माहिती अधिकारी/अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने गट-ब या संवर्गात सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी स्थापन केलेल्या निवड समितीने नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या खाली नमूद केलेल्या उमेदवारांची रुपये ९३००-३४८०० + ग्रेड वेतन ४४०० या वेतनश्रेणीत दोन वर्षाच्या कालावधीसाठी परिवीक्षाधीन नियुक्ती करण्यात येत असून त्यांच्या नावापुढे स्तंभ ५ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. १ | उमेदवाराचे नाव २ | प्रवर्ग ३ | गुणानुक्रम ४ | पदस्थापनेचे पद ५ |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती संप्रदा दत्तात्रय बीडकर | खुला | १ | माहिती अधिकारी, उप माहिती कार्यालय, डहाणू |

२. श्रीमती बीडकर ह्या सहायक संचालक (माहिती)/ माहिती अधिकारी/ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने गट-ब संवर्गातील पदावर दोन वर्षाच्या कालावधीसाठी परिवीक्षाधीन अधिकारी म्हणून कार्यरत असतील.

३. श्रीमती बीडकर यांचे काम परिविक्षाधीन काळात अपेक्षित दर्जाचे आढळले नाही किंवा त्यांची वर्तणूक समाधानकारक किंवा गट-ब दर्जाच्या अधिकाऱ्यास शोभेल अशी न आढळल्यास त्यांना सेवेतून कमी करण्यात येईल.

४. परिविक्षाधीन काळात श्रीमती बीडकर यांनी शासकीय अधिकाऱ्यांसाठी विहित केलेल्या मराठी व हिंदी भाषा परीक्षा, जर ते त्या परिक्षामध्ये यापूर्वीच उत्तीर्ण झालेले नसतील तर किंवा त्यांना अशा परिक्षेत उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

५ श्रीमती बीडकर यांनी या आदेशाच्या दिनांकापासून **एक महिन्याच्या आत** संबंधित पदावर हजर होणे आवश्यक आहे. विहित केलेल्या मुदतीत हजर न झाल्यास निवडसूचीवरील त्यांच्या गुणवत्ताक्रमानुसार अनुज्ञेय असलेली संवर्गातील ज्येष्ठता त्यांना मिळणार नाही. तसेच प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांच्याकडून वरील मुदतीत काहीही कळविण्यात न आल्यास निवडयादीवरील त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता काढून टाकण्यात येईल. व प्रतिक्षा सूचीवरील उमेदवारास नियुक्ती देण्यात येईल. याची कृपया नोंद घ्यावी.

६. वर नमूद केलेल्या शर्तीव्यतिरिक्त सर्वसाधारणपणे राज्यसेवा, गट-ब च्या अधिकाऱ्यांसाठी महाराष्ट्र शासनाने विहित केलेले इतरही सेवानियम या उमेदवारास लागू असतील व त्या नियमांचे पालन करणे त्यांना बंधनकारक राहील. नियमाविषयीचे अज्ञान ही बाब कोणतीही सवलत/ सूट मिळण्यास ग्राह्य ठरणार नाही.

७.	माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या स्तरावर या संवर्गात नियुक्त झालेल्या उमेदवाराची उक्त अटी व शर्तीची पूर्तता करुन घ्यावी व तसा अहवाल शासनाला सादर करावा. विहित कालावधीत उमेदवार हजर न झाल्यास त्याची माहिती शासनास वेळीच उपलब्ध करुन द्यावी.

८.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra,gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक सांकेतांक २०११०४२०१६४७५८००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(कुं. नं. घाटगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
संचालक (माहिती) (वृत्त/जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल, मुंबई-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल, नागपूर-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
महालेखापाल, मुंबई-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
महालेखापाल, नागपूर-२ (लेखा परिक्षा), नागपूर
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
संबंधित अधिकारी (मावजमार्फत).
सामान्य प्रशासन विभाग, का-१२, १६-ब व ३४
**निवड नस्ती.**